# महाराष्ट्र शासन

क्र. संकीर्ण ०१२०/३०१/प्र.क्र.६३/पोल ५ ब
गृह विभाग, मुख्य इमारत,
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई- ४०० ०३२
दिनांक- १७ फेब्रुवारी, २०२०

वाचा :-

१) शा.नि.,वित्त विभाग क्र.अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४,दि.२९.०९.२०१८
२) पोलीस महासंचालक कार्यालयाचा क्र.पोमसं/३९/४२/सा.अ.- गायकवाड-नंदुरबार /४४७/२०१९ दि.१०.०१.२०२० रोजीचा सानुग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव.
३) श्री.गणेश उखड्या गायकवाड यांचे वारसदार श्रीमती प्रमिला गणेश गायकवाड यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरीता प्राप्त झालेला दिनांक ५.०२.२०१९ रोजीचा अर्ज

## आदेश

उपरोक्त क्रमांक २ अन्वये पोलीस महासंचालक कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती प्रमिला गणेश गायकवाड यांच्या क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागप्रमुख हे त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९सप्टेंबर,२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, **श्री.गणेश उखड्या गायकवाड यांचे वारसदार श्रीमती प्रमिलाबाई गणेश गायकवाड,दिपेंद्र गणेश गायकवाड व धनश्री गणेश गायकवाड** यांना सानुग्रह अनुदान रूपये १०,००,०००/-(अक्षरी रूपये दहा लाख फक्त) मंजूर करत आहेत.

सदर "सानुग्रह अनुदान" श्री.गणेश उखड्या गायकवाड शासकीय सेवेत पोलीस शिपाई पदावर दि.४.०८.२००६ पासून सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा होण्यापूर्वी दि.२९.११.२०१४ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्ष कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

सदरचा खर्च "मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी,१०३,अनुकंपा भत्ते,(००)(०६)-परिभाषित अंशदान/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१७१८४७०३६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2020.02.17 18:48:45 +05'30'

**( संदीप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-** १) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) जिल्हा कोषागार अधिकारी,नंदुरबार यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव
३) पोलीस अधिक्षक,नंदुरबार/ (आहरण व संवितरण अधिकारी) यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव
४) श्रीमती प्रमिला गणेश गायकवाड मु.श्रीरामपूर पो.वाघाळे ता.जि.नंदुरबार.